# भारताचे संविधान

## भाग ४ क

## नागरिकांची मूलभूत कर्तव्ये

**अनुच्छेद ५१ क**

**मूलभूत कर्तव्ये – प्रत्येक भारतीय नागरिकाचे हे कर्तव्य असेल की त्याने –**

(क) प्रत्येक नागरिकाने संविधानाचे पालन करावे. संविधानातील आदर्शांचा, राष्ट्रध्वज व राष्ट्रगीताचा आदर करावा.

(ख) स्वातंत्र्याच्या चळवळीला प्रेरणा देणाऱ्या आदर्शांचे पालन करावे.

(ग) देशाचे सार्वभौमत्व, एकता व अखंडत्व सुरक्षित ठेवण्यासाठी प्रयत्नशील असावे.

(घ) आपल्या देशाचे रक्षण करावे, देशाची सेवा करावी.

(ङ) सर्व प्रकारचे भेद विसरून एकोपा वाढवावा व बंधुत्वाची भावना जोपासावी. स्त्रियांच्या प्रतिष्ठेला कमीपणा आणतील अशा प्रथांचा त्याग करावा.

(च) आपल्या संमिश्र संस्कृतीच्या वारशाचे जतन करावे.

(छ) नैसर्गिक पर्यावरणाचे जतन करावे. सजीव प्राण्यांबद्‌दल दयाबुद्‌धी बाळगावी.

(ज) वैज्ञानिक दृष्टी, मानवतावाद आणि जिज्ञासूवृत्ती अंगी बाळगावी.

(झ) सार्वजनिक मालमत्तेचे जतन करावे. हिंसेचा त्याग करावा.

(ञ) देशाची उत्तरोत्तर प्रगती होण्यासाठी व्यक्तिगत व सामूहिक कार्यात उच्चत्वाची पातळी गाठण्याचा प्रयत्न करावा.

(ट) ६ ते १४ वयोगटातील आपल्या पाल्यांना पालकांनी शिक्षणाच्या संधी उपलब्ध करून द्याव्यात.

प्रथमावृत्ती : २०१३
पुनर्मुद्रण – २०२१



प्रस्तुत पुस्तक महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाच्या धोरणानुसार पालि अभ्यास मंडळाच्या मार्गदर्शनाखाली संपादक मंडळाने तयार केलेले आहे.

**पालि अभ्यास मंडळ सदस्य :**
प्रा. डॉ. ज्योत्स्ना खरे (निमंत्रक)
प्रा. माधव मेश्राम (समन्वयक)
प्रा. रामकृष्ण तागडे (विषय तज्ञ)
प्रा. अशोक पैठणे (सदस्य)
प्रा. अरूणा पाटील (सदस्या)
डॉ. एल.जी. मेश्राम 'विमलकिर्ती' (सदस्य)
डॉ. सुभाष आठवले (सदस्य)

**संपादक मंडळ सदस्य :**
डॉ. विश्वनाथ चौरपगार
प्रा. मोहन वानखडे
श्री. पंजाब प्रधान
डॉ. मनिष आनंद

**समन्वयक :** प्रा. माधव मेश्राम

**कार्यालयीन समन्वयक :** श्री. गोवर्धन सोनवणे.

**प्रकाशक :** श्री. कृष्णकुमार पाटील
सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे–४११ ००४.

**छपाई व वितरण :** महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे–४११ ००४.

**अक्षरजुळणी :** ट्रेन्झ, मुंबई

**निर्मिती :**
श्री विवेक गोसावी, नियंत्रक
श्री सच्चिदानंद आफळे, मुख्य निर्मिती अधिकारी
श्री राजेंद्र चिंदरकर, निर्मिती अधिकारी
श्री राजेंद्र पांडलोसकर, सहाय्यक निर्मिती अधिकारी

**मुखपृष्ठ व सजावट :** श्री. घनश्याम देशमुख

**कागद :** ७० जी.एस.एम.क्रीम वोव्ह

**मुद्रक :**

**मुद्रणादेश :**

## उद्देसिका

**मयं, भारतस्स लोक,** भारतस्स एको **बाहुभूमिकं**
**सङ्गणिकावादी धम्मनिरपेक्ख लोकसाही गणरज्ज** रचयतिस्स
च तस्स सब्बे नागरिकानं;
**बाहुजञ्ञ, वित्तिय, च राजनेत्तिक ञाय;**
**वितक्क अभिवेत्ति, विस्सास, सद्धा**
**च उपासना एस्स विमुत्ति;**
**दज्जस च सन्धीस्स समानत्त;**
**एकंस पापेतु कत्वानं ददातिस्स च**
**तं सब्बेस्मिं पुग्गलस्स पतिट्ठा**
**च रट्ठस्स समग्गी च सामग्गीयं**
**एस्स आन दातु बन्धूता**
पवड्ढितुं कितस्स सङ्कप्पपुब्बकं सम्मासङ्कप्प कत्वानं;
**अम्हाकं संविधान सभास्मिं**
अज्ज दिवांङ्क सव्वीसति कत्तिक, एकूनवीसति एकूनपञ्ञासति दिने
इत्थं अयं **संविधान अधिकत च अधिनियत**
कत्वान **सयं पत समप्पयाम.**

# राष्ट्रगीत

जनगणमन–अधिनायक जय हे
भारत–भाग्यविधाता।
पंजाब, सिंधु, गुजरात, मराठा,
द्राविड, उत्कल, बंग,
विंध्य, हिमाचल, यमुना, गंगा,
उच्छल जलधितरंग,
तव शुभ नामे जागे, तव शुभ आशिस मागे,
गाहे तव जयगाथा,
जनगण मंगलदायक जय हे,
भारत–भाग्यविधाता।
जय हे, जय हे, जय हे,
जय जय जय, जय हे।।

# पटिञ्ञा

भारतो मम देसो ।
सब्बे च भारतीया मम बान्धवा ।
अत्थि देसविसये मे पेमं ।
मम देसस्स या समिद्धता,
या च विविधताय मण्डिता परम्परा, तस्साहं मानि ।
एतं दायज्जं उपसम्पादेतुं अहं दळ्हपरक्कमो भविस्सामि ।
अहं मातापितुन्नं च आचरियानं च पाचरियानं च
वयो–अनुप्पत्तानं सक्करिस्सामि ।
सब्बे जने अहं सोरताय पटिपज्जिस्सामि ।
अहं देसविसये देसबान्धवविसये च दळ्हभत्तिं
पटिजानामि ।
यं तेसं कल्याणं तं एव होतु मे कल्याणं,
या तेसं समिद्धि सा मे समिद्धि
यं तेसं सुखं तं मे सुखं।

## प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाने ''राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखडा २००५'' व 'राज्य अभ्यासक्रम आराखडा – २०१०' यांच्या मार्गदर्शक सुचनेनुसार इयत्ता १० वी/१२ वी पालि भाषेच्या पाठ्यपुस्तकाची पुनर्रचना व निर्मिती करण्यात आली आहे.

ह्या पाठ्यपुस्तकातील भाग–१ पालि–संपूर्ण साठी असून भाग–२ पालि–संयुक्तसाठी आहे.

पालि भाषेचे तात्त्विक, वाङमयीन, भाषिक वैशिष्ट्ये व महत्व विशद करणारे घटक या पाठ्य–पुस्तकात समाविष्ट केले आहेत, त्यासाठी पालि तिपिटक, अनुपिटक ग्रंथ, वंस साहित्य, जातककथा, अट्ठकथा साहित्य, सुभाषित, काव्य इत्यादिचा वापर करण्यांत आला आहे.

पुनर्रचित अभ्यासक्रमानुसार इयत्ता दहावी व बारावीचे पालि विषयाचे पाठ्यपुस्तक द्वितीय भाषा या स्तरावर वैकल्पिक भाषा म्हणुन तयार केले आहे. त्यानुसार विद्यार्थ्यांचा वयोगट, त्याची आकलन क्षमता लक्षात घेवुन गद्य व पद्य पाठाची निवड करण्यात आली आहे.

मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाप्रमाणे पर्यावरण या विषयाचा पाठ्यपुस्तकात १० टक्के समावेश करण्यात आला आहे. पाठ्यघटकाच्या संहितेत आवश्यक तेथे काही बदल केले आहेत. संहिता लिहितांना लेखनपध्दती व विद्यमान संकेताचा स्वीकार करून एकसुत्रता आणण्याचा प्रयत्न केला आहे. पाठ निवडतांना काही चिरंतन मुल्ये आणि तत्वांचा विचार मनात ठेवलेला आहे.

पालि भाषा हे बौध्द तत्वज्ञान विशद करणारे प्रभावी व प्राचीन माध्यम आहे. सर्वप्रथम तथागत बुध्दाने सर्वसामान्य जनतेच्या भाषेचा धम्मप्रचार व प्रसारासाठी आग्रह व कटाक्ष पूर्ण वापर केला आहे. बुध्दाने भिक्खूसंघाला लोकभाषेतच आपले सर्व धम्मप्रसार, प्रचार व उपदेशाचे कार्य करण्याची संमती दिली होती. कालांतराने या भाषेला ''पालि'' या नावाने संबोधले गेले. पालि साहित्यांत समता, विचार–स्वातंत्र्य, बंधुता, परमसहिष्णुता, बुद्धिवाद, अहिंसा, लोकशाही, मानवता, नैतिकता आणि समाजवादाला पोषक विचार या विविध उदात्त तत्वमुल्यांचा समावेश होतो. वर्णभेद व जातिभेदाचे खंडण करणारे सुत्त सर्वत्र विखुरली आहेत.

तथागत बुध्दाने भिक्खूंना व्यक्तिगत संपत्ती ठेवण्याचा हक्क नाकारला, भिक्खूसंघाची संपूर्ण कार्यप्रणाली लोकशाही स्वरूपाची ठेवली. विभिन्न भाषा, प्रांत, विविध कुळातुन आलेले लोक भिक्खूसंघात एकदिलाने व प्रेमाने एकत्र राहत असत, हे दृश्य राष्ट्रीय एकात्मतेची भावना मजबुत करणारे आहे.

बुध्दाने नेहमी स्त्री–पुरूष समतेचा पुरस्कार केला आहे, शिवाय त्यांनी स्त्रीयांचा ''मातुगाम''या शब्दाने गौरव केलेला आहे. 'थेरीगाथा' हा ग्रंथ भिक्खूणींच्या योग्यतेचा आरसा वाटतो.

कुठलीही समस्या अहिंसा व प्रेमाने सुटू शकते हा अतिप्राचीन धम्म असल्याची ग्वाही देवुन युद्ध भयाने ग्रस्त विश्वाला शांतीचा संदेश दिला. बुध्दाची अहिंसा शूराची वृत्ती आहे. भारतीय व परदेशातील कला व संस्कृतीवर पालि साहित्याचा कायम ठसा उमटलेला आहे. सर्वत्र चित्रकला, मुर्तिकला, वास्तुकला व शिल्पकलेवर पालि साहित्याच्या प्रभावाच्या खुणा स्पष्ट दिसतात. श्रीलंका, म्यामार, थायलंड, कंबोडिया, लाओस, मंगोलिया, व्हिएतनाम, चीन, जपान, कोरिया, नेपाळ, बांगलादेश, तिबेट इत्यादि अनेक देश या सत्याची ग्वाही देतात.

अजिंठा, वेरूळ, सांची, भरहूत, नागार्जुनकोंडा, अमरावती, सारनाथ, बुध्दगया ही भारतीय स्थाने या साहित्याच्या प्रभावाची व बौध्द कलेची स्मारकेच ठरली आहेत. तसेच विश्वातील कथा साहित्यावर पालि जातकांचा प्रभाव आढळून येतो, हे सर्व अभ्यासक मान्य करतात.

उपरोक्त, उदात्त तत्त्वगुणांचा समावेश पालि साहित्यांत होतो. संस्कारक्षम विद्यार्थ्यांच्या मनावर याचा पोषक परिणाम होवून उत्तम चरित्र घडण होण्यास याची मदत होवु शकेल. विद्यार्थ्यांना योग्य व दर्जेदार पुस्तके उपलब्ध व्हावीत म्हणुन मंडळाने हे पाठ्यपुस्तक तयार केले आहे. पालि भाषेच्या अध्ययनाची, गोडी व आवड वाढवायला याची मदत व्हावी अशी आशा आहे.

पालि मंडळाचे निमंत्रक आणि सभासद, संपादक समीक्षक व इतर सर्वांनी आपलेपणाच्या भावनेने परिश्रम घेवून हे पाठ्यपुस्तक तयार करण्याकरिता मंडळाला जे अमोल सहकार्य दिले त्याबद्दल हे मंडळ सर्वाचे कृतज्ञतापूर्वक आभारी आहे.

पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाचे संपादक यांनी दिलेल्या सहकार्याबद्दल व मंडळाचे निमंत्रक यांनी हे पुस्तक सुबक व आकर्षक स्वरूपात वेळेवर उपलब्ध करून दिल्याबद्दल यांना मनापासून धन्यवाद !

सही

**(सर्जेराव जाधव)**

अध्यक्ष

महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च

माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे

पुणे

दिनांक : १/२/२०१३

# पालिभाषेचे महत्त्व

पालिभाषा ही भारतातील एक प्राचीन भाषा आहे. या भाषेमध्ये तथागत बुध्दाचे मूळ तत्वज्ञान संग्रहीत आहे. तथागत बुध्दाने आपला संपूर्ण धम्मोपदेश पालिभाषेमध्येच दिलेला होता. ही पालि भाषा तथागत बुध्दाच्या आधीपासून मगध देशामध्ये व मगध देशाला लागून असलेल्या अनेक जनपदांची लोकभाषा होती. परंतु या भाषेचे प्रमुख केंद्र 'मगध' देश असल्यामुळे या भाषेला 'मागधी' म्हटले जात होते. मागधी याचा अर्थ मगध देशामधील लोकांची भाषा होय. मगध देश म्हणजे आजच्या बिहार राज्यातील एक अतिशय महत्वाचा भूभाग होय. या मागधी प्रदेशाला, भूभागाला प्राचीन भारतीय इतिहासामध्ये अतिशय महत्वाचे स्थान होते व आज सुध्दा आहे, मगध प्रांत हा बुध्द धम्माच्या उदयाचा, बौद्ध संस्कृतीच्या उदयाचा, लोकशाहीवादी समाजव्यवस्थेच्या उदयाचा, लोकशाहीवादी जीवन मूल्यांच्या उदयाचा व संवर्धनाचा प्रदेश होता. या मगध प्रांतामध्ये तथागत बुध्दाने अनेकदा चारिका केलेली होती, वर्षावास केलेले होते, त्याचप्रमाणे तथागत बुध्दाने वैशालीच्या वज्जिंच्या लोकशाहीवादी जीवन प्रणालीचे अतिशय उदारपणाने समर्थन करून प्रशंसा केलेली होती. या संबंधीची संपूर्ण माहिती पालितिपिटकामध्ये उपलब्ध आहे.

पालितिपिटक म्हणजे तथागत बुध्दाच्या मूळ उपदेशाचा संग्रह असून तो पालिमध्ये आहे. पालितिपिटकाला बुध्दवचन असेही संबोधले जाते. पालिभाषेचे मूळ नाव 'मागधी' असून नंतर 'पालि' अट्ठकथाकारांनी या मागधी भाषेला 'पालि' या नावाने संबोधलेले आहे. 'पालि' याचा अर्थ असाही केला जातो की 'पालेन्ती ति इति पालि' म्हणजेच जी सर्व सामान्य लोकांचे पालन करते, संरक्षण करते ती भाषा म्हणजेच पालि होय. 'पालि' शब्दाची निर्मिती कशी झाली या बद्दल वेगवेगळ्या विद्वानांच्या, भाषाशास्त्रज्ञांच्या, पालिभाषेच्या अभ्यासकांच्या वेगवेगळ्या  मान्यता आहेत. काहींच्या मते 'पल्लि' शब्दापासून 'पालि' शब्दाची निर्मिती झाली अशी मान्यता आहे. 'पल्लि' म्हणजे गाव. अर्थात गावच्या लोकांची भाषा म्हणजेच पालि होय. काही विद्वानाच्या मते 'पंक्ति' या शब्दापासून 'पालि' शब्दाची निर्मिती झाली, असेही मानले जाते.

'पंक्ति' म्हणजे ओळ, पंगत असा होतो. म्हणजेच पालि भाषा एखाद्या पंक्ति, ओळीप्रमाणे सुव्यवस्थित, सूत्रबद्ध, सरळ व सोपी आहे. त्याचप्रमाणे पालिमधील बुध्दवचन अतिशय सूत्रबद्ध, सरळ, सोपे व व्यवस्थित आहेत म्हणूनच या गुणवैशिष्ट्यामुळे मागधी भाषेला पालि अट्ठकथाकारांनी 'पालि' या नावाने संबोधलेले आहे. अशा प्रकारे पालि भाषेमधील भाषिक गुणवैशिष्ट्यामुळे व बुद्धवचनांच्या सुसुत्रबद्धतेमुळेच मागधी भाषेला पालि या नावाने संबोधले गेलेले आहे. या पालि भाषेमध्ये विशाल असे साहित्य आहे. तिपिटक साहित्य आहे, अनुपिटक साहित्य आहे, अट्ठकथा साहित्य आहे, वंससाहित्य आहे. त्याचप्रमाणे या पालि साहित्यामध्ये साहित्याचे (वाङ्मयाचे) जवळ-जवळ सर्वच प्रकार आढळून येतात. यात पालिगद्य साहित्य आहे, पालिकाव्य (पद्य) साहित्य आहे, कथा साहित्य आहे. त्यात लघुकथा, दीर्घकथा साहित्य आहे, संवाद साहित्य आहे, वृत्तान्त पध्दतीचे साहित्य आहे, उदान आहे, इतिवुत्तक साहित्य आहे, इत्यादी साहित्याचे अनेक प्रकार आहेत. तथागत बुद्धाने आपली शिकवण लोक भाषेत सांगून पालिभाषेला एक विश्वभाषा म्हणून दर्जा प्राप्त करून दिला. कारण पालि भाषा ही मूळची प्राचीन भारतीय भाषा आहे. पालि भाषा तथागताच्या पूर्वी दैनंदिन जीवनात बोलली जाणारी लोकभाषा होती. तत्त्कालीन लोकांच्या दैनंदिन व्यवहारिक भाषेत त्यांनी धम्माची शिकवण दिली. त्यामुळे लोकांना त्याचे अधिक चांगले आकलन झाले. सम्राट अशोकाच्या काळात (इ.स.पुर्व २७०-२३३) काबुल, गांधार, कंदहार, अफगाणिस्थान, बलुचिस्थान, मकरान इत्यादी भूप्रदेशातील सर्व नागरिक बौद्ध अनुयायी होते.

पालिभाषा ही प्राचीन भारतीय भाषा असली तरीही या भाषेमध्ये सिंहल, म्याँमार, थाईलंड इत्यादी देशामध्ये पालि ग्रंथ रचना करण्यात आलेली आहे व आज सुध्दा भारताच्या दक्षिण-पूर्व देशात पालि भाषेमध्ये साहित्य निर्मिती, ग्रंथरचना केली जात आहे. पालि भाषेमध्ये काव्य रचना केली जात आहे. त्याचप्रमाणे तात्त्विक व वैचारिक ग्रंथांचे लेखन पालिमध्ये केले जाते आहे. या दृष्टीने धम्मानंद कोसम्बी, डॉ. भरतसिंह उपाध्याय, भिक्खू जगदीस कस्सप यांचे कार्य अतिशय महत्त्वाचे आहे. सिंहलमध्ये व म्याँमारमध्ये पालिग्रंथ लेखन करण्याची आजही फार मोठी परंपरा आहे. आज भारतामध्ये फार मोठ्याप्रमाणात वेगवेगळ्या स्तरावर पालिभाषेचे अध्यापन व अध्ययन कार्य होत आहे.

पालिभाषेचा प्रभाव भारताच्या मध्यकाळातील अपभ्रंश इत्यादी भाषावर आढळून येतो. त्याचप्रमाणे आधुनिक भारतातील जवळ-जवळ सर्वच लोकभाषांवर पालिभाषेचा प्रभाव आढळून येतो. आधुनिक भारतातील अनेक लोकभाषामध्ये अर्थात मराठी, हिंदी, पंजाबी, बंगाली, गुजराथी, भोजपुरी, मैथिली, अवधी, कोरकू इत्यादींवर पालि भाषेचा प्रभाव व त्यांचा पालिशी संबंध आढळून येतो. दक्षिणभारतातील अनेक लोकभाषावर, सर्वसामान्य लोकांच्या भाषा व बोलीवर पालिभाषेचा प्रभाव आढळून येतो. भारतातील सर्वसामान्य लोकांच्या दैनंदिन जीवनातील बोली-भाषेशी पालिभाषा ही अधिक जवळीक ठेवणारी भाषा आहे. सिंहली भाषा, म्याँमार, थाईलंडमधील इतर भाषा व बोली मध्ये सुध्दा पालिभाषेचा प्रभाव निश्चितपणे आढळून येतो. कारण ज्या ज्या देशामध्ये बुध्दाचा धम्म गेलेला आहे, तेथे तेथे पालिभाषासुद्धा गेलेली आहे. पालिभाषेने जगातील लोकभाषांचे महत्त्व स्थापित केलेले आहे.

पालि भाषा शिकण्याच्या दृष्टीने व समजण्याच्या दृष्टीने अतिशय सोपी आहे.कारण या भाषेमध्ये अक्षरांची (वर्ण) संख्या एकेचाळीस आहे. त्यात तेहतीस व्यंजन व आठ स्वर आहेत. त्याचप्रमाणे पालिमध्ये एकवचन व बहुवचन आहे. त्यामुळेच ही भाषा व्याकरणदृष्ट्या शिकण्याकरीता सोपी आहे. या भाषेमध्ये व्याकरण सूत्रांची संख्या सुद्धा सातशे/आठशे पेक्षा जास्त नाही. म्हणूनच आधुनिक भाषाशास्त्राच्या दृष्टीने सुध्दा या भाषेला फार महत्व आहे. पालिभाषेचे व्याकरण पालिमध्येच आहे व पालि साहित्याचे अलंकारशास्त्रसुद्धा पालिमध्येच आहे. सर्वसाधारण पालिव्याकरणाच्या अभ्यासाने सुध्दा पालिभाषेला समजून घेता येते व पालि साहित्याचे अध्ययन करता येते. पालिभाषेची स्वतंत्र व्याकरण परंपरा आहे. अशा अनेक दृष्टिने प्राचीन काळापासून तर आधुनिक काळापर्यंत व संपूर्ण बौध्दसंस्कृती, बौध्दतत्वज्ञान, बौध्द इतिहास, बौध्द जीवनमूल्ये समजून घेण्याच्या दृष्टीने, जाणून घेण्याच्या दृष्टिने पालिभाषेला फार महत्त्व आहे. प्राचीन भारताचा इतिहास, राजकारण, अर्थकारण, समाजकारण, भूगोल, ज्ञान-विज्ञान, सांस्कृतिक देवान-घेवान इत्यादींना समजून घेण्याकरीता सुध्दा पालिभाषेच्या अध्ययनाचे महत्त्व आहे. सम्राट अशोकाच्या शिलालेखांचे महत्व व स्वरूप समजून घेण्याकरीता पालिभाषेचे ज्ञान असणे आवश्यक आहे. अशा अनेक दृष्टिने पालि भाषेच्या अध्ययनाचे महत्त्व लक्षात घेता महाराष्ट्र शासनाने आपल्या माध्यमिक व उच्च माध्यमिक अभ्यासक्रमामध्ये पालिभाषेच्या अध्ययनाला समाविष्ट केले ही बाब अतिशय महत्त्वाची आहे.

पालिभाषेची जन्मभूमि असलेल्या मध्यकालीन भारतामध्ये पालिभाषेचे अध्ययन, अध्यापन, विलुप्त झालेले होते. परंतु आधुनिक भारतामध्ये बौध्द धम्माच्या पुनर्स्थापनेबरोबरच पालिभाषेच्या अध्ययन-अध्यापनाला महत्त्व प्राप्त झालेले आहे. या घटनेला वर्ष २०१२ मध्ये शंभर वर्ष पूर्ण होत आहे. म्हणजेच हे वर्ष आधुनिक भारतामध्ये महाराष्ट्रात पालि भाषेच्या अध्यपनाचे शताद्बी वर्ष आहे, ही बाब विशेष उल्लेखनीय आहे. असे म्हणता येईल.

पालि भाषा ही प्राचीन भारतीय भाषा असून ती एक अभिजात भाषा आहे. कारण या भाषेमध्ये अतिशय महत्त्वाचे साहित्य आहे. त्यामुळे या भाषेच्या अध्ययन व अध्यापकाला महत्त्व तर आहेच, शिवाय नौकरी व व्यक्तिगत प्रतिभा वाढविण्याच्या दृष्टिनेही या भाषेच्या अध्ययनाला महत्त्व आहे. आज जगामध्ये सर्वत्र या भाषेचे वेगवेगळ्या दृष्टिने अध्ययन होत असल्यामुळे या भाषेच्या अध्ययनाने बऱ्याच प्रमाणात नोकऱ्यांची संधी सुध्दा निर्माण झालेली आहे. तसेच मानवी बंधनाना झुगारून समता, स्वातंत्र्य, बंधुता व न्याय ही मुल्ये जोपासण्याचे महान कार्य पालि भाषेने केले आहे. यामुळे पालिभाषेचा अभ्यास करण्याऱ्या वाचकाला त्याच्या कल्याणाची व जीवन जगण्याची उत्तम संहिता बनते. पालि भाषेच्या अध्यायनामुळे ''बहुजन हिताय, बहुजन सुखाय'' ही राष्ट्रभावना वृद्धींगत होते. मानव सर्व प्रकारच्या बंधनापासून मुक्त होतो. तो विकार मुक्त होतो. हेच या पालि साहित्याचे वैशिष्ट्य आहे म्हणून आजच्या विज्ञान युगात, सर्व क्षेत्रात या साहित्याचे अध्ययन-अध्यापन होणे अगत्याचे आहे.

ब)

**खुद्दकनिकायाचे भाग**

१) खुद्दकपाठ, २) धम्मपद, ३) उदान, ४) इतिवुत्तक, ५) सुत्तनिपात, ६) विमानवत्थु, ७) पेतवत्थु, ८) थेरगाथा, ९) थेरीगाथा, १०) जातक, ११) निद्देस, १२) पटिसम्भिदामग्ग, १३) अपदान, १४) बुध्दवंस, १५) चरियापिटक

३) **अभिधम्मपिटक**

# पाठानुक्कमो

## गज्जो विभागो

भाग-१ (पालि-संपूर्ण)



## पज्जो विभागो



## थुलवाचनं



## परिशिष्ट /परिसिट्ठ

## इयत्ता – दहावी

## विषय – पालि (संयुक्त)

## पाठानुक्कमो

### गज्जपाठो

**भाग – २ (पालि – संयुक्त)**



### पज्जपाठो



### परिसिट्ठ

# १  दस उपासकगुणा 

(प्रस्तुत पाठ पालि अनुपिटक साहित्यातील 'मिलिन्द पञ्हो' या ग्रंथामधून घेतला असून यामध्ये उपासकांच्या (विद्यार्थ्यांच्या) अंगी कोणते गुण असावेत हे सांगितले आहे.)

''दस इमे, महाराजं, उपासकस्स उपासकगुणा। कतमे दस? इध, महाराज, उपासको सङ्घेन समानसुखदुक्खो होति, धम्माधिपतेय्यो होति, यथाबलं संविभागरतो होति, जिनसासनं परिहानि दिस्वा अभिवड्ढिया वायमति सम्मादिट्ठिको होति, अपगतको तूहलमङ्गलिको जीवितहेतु पि न अञ्ञ सत्थारं उद्दिसति, कायिकं वाचसिकं चस्स रक्खितं होति, समग्गारामो होति समग्गरतो, अनुसूयको होति न च कुहनवसेन सासने चरति। बुद्ध  सरणं गतो होति, धम्मं सरणं गतो होति, सङ्घं सरणं गतो होति। इमे खो, महाराज, दस उपासकस्स उपासकगुणा।''

**(मिलिन्द पञ्हो – मेण्डकपञ्हो)**

## शब्दार्थ / सद्दत्थ

**उपासकस्स** – उपासकाचे.

**गुणा (पु.)** – सद्गुण.

**यथाबलं (क्रि.वि.)** – शक्तिनुसार.

**संविभागर (पु.)** – उदार, दानी.

**दिस्वा (पूर्व. क्रि.)** – पाहुन.

**अभिवड्ढिया** – वाढ होणे, वृद्धी होणे.

**सम्मादिट्ठिको** – सम्यक दृष्टी असणारा.

**कायिक** – शारीरीक.

**चरति (क्रि.)** – हिंडणे, फिरणे.

## स्वाध्याय

**प्रश्न १ :** उपासकांच्या अंगी कोणते गुण असावेत?

**प्रश्न २ :** उपासक कोणाला म्हणावे?

**प्रश्न ३ :** तीन शरण कोणते?

❑❑❑

२

# दन्तकट्ठं

('दन्तकट्ठं' हा पाठ विनयपिटकातील चूळ्ळवग्गपालिमधील खुद्दकवत्थुक्खन्धकं यामधून घेतलेला आहे. यामध्ये आरोग्याबाबत दक्ष राहण्याचा उपदेश तथागत बुद्ध आपल्या भिक्खूसंघाला देतात. दात स्वच्छ न करण्याचे पाच दोष आणि दात स्वच्छ करण्याचे पाच गुण कोणते असतात हे तथागतांनी आपल्या भिक्खू संघाला सांगितले आहेत.)

तेन खो पन समयेन भिक्खू दन्तकट्ठं न खादन्ति। मुखं दुग्गन्धं होति। भगवतो एतमत्थं आरोचेसुं।

पञ्चिमे, भिक्खवे, आदीनवा दन्तकट्ठस्स अखादने – १.अचक्खुस्सं, २. मुखं दुग्गन्धं होति, ३. रसहरणियो न विसुज्झन्ति, ४. पित्तं सेम्हं भत्तं परियोनन्धति, ५. भत्तमस्स नच्छादेति – इमे खो, भिक्खवे, पञ्च आदीनवा दन्तकट्ठस्स अस्वादने।

''पञ्चिमे, भिक्खवे, अनिसंसा दन्तकट्ठस्स खादने – १. चक्खुस्सं, २. मुखं न दुग्गन्धं होति, ३. रसहरणियो विसुज्झन्ति, ४. पित्तं सेम्हं भत्तं न परियोनन्धति, ५. भत्तमस्स छादेति – इमे खो, भिक्खवे, पञ्च अनिसंसा दन्तकट्ठस्स खादने। अनुजानामि, भिक्खवे, दन्तकट्ठं''ति।

**( विनयपिटके – 'चुल्लवग्ग')**

**शब्दार्थ / सद्दत्थ**

**दन्तकट्ठं न खादन्ति** – दात स्वच्छ करीत नव्हते.
**मुखं दुग्गन्धं होति** – तोंडाची दुर्गंधी येत होती.
**एतमत्थं** – ही गोष्ट.
**आरोचेसुं** – सांगितल्या गेली.
**आदीनवा** – दोष.
**अचक्खुस्सं** – पहायला सुंदर दिसत नाहीत.

**रसहरणियो न विसुज्झन्ति** – नस–नाडी स्वच्छ राहात नाहीत.
**पित्तंसेम्हं** – पित्त, कफ.
**भत्तं** – जेवण.
**परियोनन्धति** – (कण) चिटकणे.
**नच्छादेति** – रूचकर लागत नाही.
**पञ्च** – पाच.

## अभ्यास

### अ. खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. 'दन्तकट्ठं' या पाठात कशासंबंधी उपदेश दिलेला आहे?
२. 'दन्तकट्ठं' पाठातील उपदेश कुणी व कुणास दिलेला आहे?
३. दात स्वच्छ न करण्याचे पाच दोष कोणते?
४. दात स्वच्छ करण्याचे पाच गुण कोणते?

### ब. खालील पालि प्रश्नांची पालिमध्ये उत्तरे लिहा.

१. 'दन्तकट्ठं' पञ्चगुणनि किं?
२. 'दन्तकट्ठं' न खादन्ति, किं आदीनवा अहोसि?
३. 'दन्तकट्ठं' इदं पकरणस्मिं अस्स उपदेसो अत्थि?

## ३

# तनया सुखं ददाति

**''तनयं तनया सु, सुखं ददाति द्विसु गेहन्ति''**
**(मुलापेक्षा मुलगी बरी, सुख देते दोन्ही घरी)**

(इ.स. पूर्व ५०० मध्ये जेव्हा तथागत हे श्रावस्ती मधील मिगारमातेच्या पुर्वाराम विहारात विहार करीत होते. तेव्हा कोसलराज प्रसेनजित यांच्या मल्लिकादेवी (राणी)ला मुलगी झाली असे कळल्यानंतर, राजा प्रसेनजितला खिन्न वाटले. त्यावेळी तथागताने राजा प्रसेनजित यांना उपदेश केला. ते म्हणाले. ''मुलापेक्षा मुलगी बरी, सुख देते दोन्ही घरी.''

या पाठ्य घटकातुन आधुनिक काळात होणाऱ्या स्त्री भ्रूण हत्या विषयक ज्वलंत प्रश्नाचे सामाजिक दृष्टिकोणातून उद्‌बोधक उपदेश तथागताने केलेले आहे.)

---

''सावत्थि निदानं। अथ खो रञ्ञा पसेनदि कोसलो येन तथागतो तेनुपसङ्कमि; उपसङ्कमित्वा तथागतो अभिवादेत्वा एकमन्तं निसीदि। अथ खो अञ्ञतरो पुरिसो येन रञ्ञा पसेनदि कोसलो तेनुपसङ्कमि; उपसङ्कमित्वा रञ्ञो पसेनदिस्स कोसलस्स उपकण्णके आरोचेसि-''मल्लिकादेवी, धीतरं विजाता'' ति। एवं वुत्ते, रञ्ञा पसेनदि कोसलो अनत्तमनो अहोसि।

अथ खो तथागतो राजानं पसेनदि कोसलं अनत्तमनतं विदित्वा तायं वेलायं इमा गाथायो अभासि-

''इत्थि पि हि एकच्चिया, सेय्या पोस जनाधिपं।
मेधाविनी सीलवती, सस्सुदेवा पतिब्बता।।
तस्सा यो जायति पोसो, सुरो होति दिसम्पति।
तादिसा सुभगिया पुत्तो, रज्जं पि अनुसासती'' ति।।

(**संदर्भ - मल्लिकासुत्तं - 'संयुत्तनिकाय'पालि भाग - १, पान ८५**)

---

**शब्दार्थ / सद्दत्थ**

**निदान** - निदान, भूमिका.
**अञ्ञतरो** - अन्य.
**धीतरं** - मुलगी.
**तायं** - रक्षण, सांभाळ करणे.
**इत्थी** - स्त्री.
**पोस(वि)**- सांभाळणारा.
**रञ्ञा** - राजा.
**उपकण्णक** - गुप्तपणे ऐकणारा.
**विजाता** - आई, जननी.
**वेलायं** - वेळी, समयी.
**एकच्चिया** - एकत्र, समुदाय.
**जनाधिपं** - निर्माती.
**निसीदि** - बसला.
**आरोचेसि** - सुचित केले, सांगितले.
**अनत्तमनो** - असंतुष्ट.

**इमा** - ह्या.
**सेय्या** - अधिक श्रेष्ठ.
**मेधावी** - बुध्दिमान.
**सीलवती** - शीलवान.
**सस्सुदेवा** - सासऱ्याची सेवा करणारी.
**पतिब्बता** - पतिव्रता.
**जायति** - उत्पन्न होतो.
**सुरो** - पराक्रमी, लढवय्या.
**दिसम्पति** - दिव्यसम्पति, राजा नरेश.
**तादिसा** - त्यासारखा.
**सुभगिया** - सौभाग्यपूर्ण, सुदैवी.
**अनुसासति** - उपदेश करणारा.
**तनय** - मुलगा.
**तनया** - स्वतःची मुलगी.

**स्वाध्याय**

१. 'मुलापेक्षा मुलगी बरी' या विषयी थोडक्यात लिहा.

❑❑❑

# ४  पच्चुपकारकथा 

(या कथेत उपकारांची फेड परोपकाराने कशी केली जाते याचे वर्णन आहे. रोगजर्जर झालेला कुत्रा, ब्राह्मणाने त्याला रोगमुक्त केल्यावर त्या उपकाराची फेड तो त्याचा जीव वाचवून करतो. उलट ब्राह्मणाची पत्नी त्याच्या जीवावर उठते. अनेकदा माणसापेक्षा पशुच अधिक प्रामाणिकपणाने वागतो याचे वर्णन यात आलेले आहे.)

जम्बुदीपे चन्दभागा नाम नदीतीरे होमगामं नाम अत्थि। तस्मि एको मरूतो नाम ब्राह्मणो पटिवसति। तदा सो वोहारत्थाय तक्कसिलं गन्त्वा गेहं आगच्छन्तो अन्तरामग्गे एकाय सालाय कुट्ठरोगातुरं सुनखं दिस्वा तस्मिं कारूञ्ञेन नीळवल्लि तक्कम्बिलेन मद्दित्वा पायेसि। सुनखो वूपसन्तरोगो पाकतिको हुत्वा ब्राह्मणेन अत्तनो कतूपकारं सल्लक्खेन्तो तेनेव सद्धिं अगमासि । अपरभागे ब्राह्मणस्स भरिया गब्भ पटिलभिं। ताय विजायनकाले दारको तिरियं पतित्वा अन्तोगब्भे येव मतो।

तदा तं सत्थेन खण्डाखण्डिकं छिन्दित्वा नीहरिंसु। अथ ब्राह्मणो तं दिस्वा निब्बिन्नहदयो घरावासं पहाय इसिपब्बज्जं पब्बजित्वा अरञ्ञे विहरति। अथस्स भरिया अञ्ञेन सध्दिं संवसन्ती 'अयं मं पहाय पब्बजितो' ति ब्राह्मणे पदुट्ठचित्ता – भो ! 'ब्राह्मणं मारहींति सामिकेन सद्धिं मन्तेसि। तेसं मन्तणं सुनखो सुत्वा ब्राह्मणेनेव सध्दिं चरति।

अथेक दिवसं तस्सा सामिको 'तापसं मारेस्सामी' ति धनुकलापं गहेत्वा निक्खमि। तदा तापसो फलाफलत्थाय अरञ्ञं गतो। सुनखो अस्समे एवं ओहीयि। पुरिसो तापसस्स आगमनमग्गं ओलोकेन्तो गच्छन्तरे निलीनो अच्छि। सुनखो तस्स पमादं ओलोकेत्वा धनुनो गुणं खादित्वा छिन्दि। सो पुन गुणं पाकतिक कत्वा आरोपेसि। एवं सो आरोपितं आरोपितं खादंतेव।

अथ खो पापपुरिसो तापसस्स आगमनं ञत्वा 'तं मारेस्सामी' ति धनुना सध्दिं अगमासि। अथस्स सुनखो पादे डंसित्वा पातेत्वा तस्स मुखं खादित्वा दुब्बलं कत्वा भुंङ्कारमकासि। एवं हि सप्पुरिसा अत्तनो उपकारकानं पच्चुपकारं करोन्ति।

**(जातक अट्ठकथा)**

## शब्दार्थ / सद्दत्थ

**चन्दभागा** – (ना.) चन्द्रभागा नदी (चिनाब).
**वोहार** – (ना.) व्यापार.
**तक्कम्बिल** – (ना.) आंबट ताक.
**निब्बिन्नहदयो** – उद्विग्नहृदय.
**मन्त** – कट रचणे, सल्ला देणे.
**धनुकलाप** – धनुष्यबाण.
**कतूपकारं** – उपकृत करणारा.
**गहेत्वा** – घेऊन.
**आरोपित** – दोष लावल्या गेलेला.
**पच्चुपकार** – प्रत्युपकार, त्याच्या प्रती उपकार.
**खादित्वा** – खाऊन.
**तापसस्स** – तपस्वीचे.
**दुब्बलं** – दुर्बल.
**भरिया** – पत्नी.
**तक्कसिलं गन्त्वा** – तक्षशिलेला जाऊन.
**नीलवल्ली** – नीलवर्ण लता.
**अरञ्ञगत** – जंगलामध्ये गेलेला.
**दारको** – मुलगा.
**सुत्वा** – ऐकून.
**कत्वा** – करून.

## स्वाध्याय

**प्रश्न १. खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.**

१. कुत्र्याने परोपकाराची परतफेड कशाप्रकारे केली?
२. ''पच्चुपकारकथा'' या पाठाचा बोध स्पष्ट करा?

**प्रश्न २. खालील पालि वाक्यांचे घटनानुक्रमाने फेरमांडणी करा.**

१. तदा सो वोहारत्थाय तक्कसिलं गन्ता गेहं आगच्छन्तो।
२. तस्मिं कारूञ्ञेन नीलवल्लिं तक्कम्बिलेन मद्दित्वा पायेसि।
३. तस्मिं एको मरूतो नाम ब्राह्मणो पटिवसति।
४. जम्बुदीपे चन्दभागा नाम नदीतीरे होमगामं नाम अत्थि।
५. अन्तरामग्गे एकाय सालाय कुट्ठरोगातुरं सुनखं दिस्वा।

# ५  बोधिकथा 

(विनय पिटकाच्या महावग्गातील महाक्खन्धकामध्ये 'बोधिकथा' आलेली आहे. 'बोधिकथा' म्हणजेच तथागत बुद्धाच्या बोधिप्राप्तीसंबंधीची कथा होय. या बोधिकथेमध्ये तथागत बुद्धाच्या बुद्धत्व प्राप्तीपासून धम्मचक्क पवत्तनापर्यंतचे अनेक प्रसंग आलेले आहेत. या बोधिकथेत बुद्धाला अनुभवास आलेले, बुद्धाने जाणलेले प्रतित्यसमुत्पादाचे अनुलोम व पटिलोम पद्धतीने विवेचन करण्यात आलेले आहे.)

तेन समयेन बुद्धो भगवा उरुवेलायं विहरति नज्जा नेरञ्जाय तीरे बोधिरूक्खमूले पठमाभिसम्बुद्धो। अथ खो भगवा बोधिरुक्खमूले सत्ताहं एकपल्लङ्केन निसीदि विमुत्तिसुखपटिसंवेदी। अथ खो भगवा रत्तिया पठमं यामं पटिच्चसमुप्पादं अनुलोमपटिलोमं मनसाकासि – ''अविज्जापच्चया सङ्खारा, सङ्खारपच्चया विञ्ञाणं, विञ्ञाणपच्चया नामरूपं, नामरूपपच्चया सळायतनं, सळायतनपच्चया फस्सो, फस्सपच्चया वेदना, वेदना पच्चया तण्हा, तण्हापच्चया उपादानं, उपादानपच्चया भवो, भवपच्चया जाति, जातिपच्चया जरामरणं सोकपरिदेवदुक्खदोमनस्सुपायासा सम्भवन्ति – एवमेत्तस्स केवलस्स दुक्खक्खन्धस्स समुदयो होति।

अविज्जाय त्वेव असेसविरागनिरोधा सङ्खारनिरोधो, सङ्खारनिरोधा विञ्ञाणनिरोधो, विञ्ञाणनिरोधा नामरूपनिरोधो, नामरूपनिरोधा सळायतननिरोधो, सळायतननिरोधा फस्सनिरोधो, फस्सनिरोधा वेदना निरोधो, वेदनानिरोधा तण्हानिरोधो, तण्हानिरोधा उपादाननिरोधो, उपादाननिरोधा भवनिरोधो, भवनिरोधा जातिनिरोधो, जातिनिरोधा जरामरणं सोकपरिदेवदुक्ख दोमनस्सुपायासा निरुज्झन्ति – एवमेतस्स केवलस्स दुक्खक्खन्धस्स निरोधो होती '' ति ।

अथ खो भगवा एतमत्थं विदित्वा तायं वेलायं इमं उदानं उदानेसि –

“यदा हवे पातुभवन्ति धम्मा।
आतापिनो झायतो ब्राह्मणस्स।
अथस्स कङ्खा वपयन्ति सब्बा।
यतो पजानाति सहेतुधम्मं” ति ।।

**(संखित्त – पिटक, पठमोभागो,
संसोधको : डॉ. नथमल टाटिया
महाखन्धकं : बोधिकथा)**

---

## शब्दार्थ / सद्दत्थ

**अनुलोम (वि.)** – सरळक्रमाने.
**पटिलोम (वि.)** – विरूद्धक्रमाने.
**अविज्जा (स्त्री.)** – अविद्या.
**पच्चय (पु.)** – हेतु, कारण, उद्देश, आवश्यकता.
**सङ्खार (पु.)** – संस्कार.
**विञ्ञाण (नपु.)** – विज्ञान, चेतना.
**नाम (नपु.)** – नाम, व्यक्तित्वाचा चैतिसिक भाग.
**सळायतन (न.)** – डोळा, कान, नाक इत्यादी सहा इन्द्रिये.
**फस्स (पु.)** – स्पर्श.
**वेदना (स्त्री)** – पिडा, इन्दियजनित अनुभुती.
**तण्हा (स्त्री)** – तृष्णा.
**उपादान (नपु.)** – आसक्ती.
**भव (पु.)** – अस्तित्व, संसार.
**जाति (स्त्री.)** – जन्म, जाति (वंश-परंपरा).
**जरा (स्त्री.)** – म्हातारपण, वृध्दत्व.
**मरण (नपु.)** – मृत्यु.
**सोमनस्स (नपु.)** – असंतोष, चैतसिक दुक्ख.
**उपायास (पु.)** – चिन्ता, दुक्ख, पश्चाताप.
**एवमेव (अव्यय)** – अशाप्रकारे.
**केवळ (वि.)** – संपूर्ण, समस्त.
**समुदय (पु.)** – उत्पत्ती.
**यदा (क्रि. वि.)** – जेव्हा.
**पातुभवति (वि.)** – प्रयत्नशील.

## स्वाध्याय

### प्रश्न १. दिलेली वाक्य पाठातील घटनाक्रमानुसार पुन्हा लिहा.

१. अथस्स कङ्खा वपयन्ति सब्बा, यतो पजानाति सहेतुधम्म'ति।
२. अथ खो भगवा रत्तिया पठमं यामं पटिच्चसमुप्पादं अनुलोम पटिलोमं मनसाकासि ।
३. एवमेतस्स केवलस्स दुक्खक्खन्धस्स निरोधो होती'ति।
४. अथ खो भगवा बोधिरूक्खमूले सत्ताहं एकपल्लंङ्केन निसीदि विमुत्तिसुखं पटिसंवेदी।
५. यदा हवे पातुभवन्ति धम्मा आतापिनो झायतो ब्राह्मणस्स।

**प्रश्न २ जोड्या लावा –**

| ‘अ’ गट | ‘ब’ गट |
|---|---|
| १. बुद्धो भगवा | १. निरोधो होती’ति |
| २. अविज्जापच्चया सङ्खारा | २. उरुवेलायं विहरति |
| ३. बोधिरूक्खमूले सत्ताहं | ३. सङ्खारपञ्चया विञ्ञाण |
| ४. दुक्खक्खन्धस्स | ४. पठमाभिसम्बुद्धो |

**प्रश्न ३** तथागत बुद्धाने सांगितलेली बारा निदानांची साखळी स्पष्ट करा.

## ६  इत्थि पण्डिता होति 

(''एतदग्गं भिक्खवे, मम साविकानं भिक्खुनीनं खिप्पभिञ्ञानं यदिदं भद्दा कुण्डलकेसा'' म्हणजे भद्दा कुण्डलकेसा सर्व भिक्खुनीमध्ये अग्र साविका आहे, असे उद्‌गार बुद्धाने तिच्या बद्दल काढले. तसेच 'स्त्री सुद्धा हुशार असते' असे तिच्या वयाच्या १६-१७ व्या वर्षी धीट वागण्याकडे बघून लक्ष्यात येते. ते या पाठात सांगण्यात आले आहे.

वयाच्या सोळाव्या वर्षी चोराच्या प्रेमात पडून, वडीलांकडे हट्ट करून, भद्दा चोराबरोबर लग्न करते आणि त्याची मनोभावे सेवा करते. पण चोराच्या मनात मोह असतो तो तीच्या दागिन्यांचा, दागिन्यांसाठी तीचा जीव घेण्याचा प्रयत्न करतो व भद्दा तो प्रयत्न कसा हाणुन पाडते त्याची ही कथा आहे. हे स्त्री शक्तीचे एक उत्तम उदाहरण आहे.)

भद्दा तिस्सा महता परिवारेन वड्ढमाना वयप्पत्ता, तस्मिंयेव नगरे पुरोहितस्स पुत्तं सन्तुकं नाम चोरं सहोड्ढं गहेत्वा राजाणाय नगरगुत्तिकेन मारेतुं आघातनं निय्यमानं, सीहपञ्जरेन ओलोकेन्ती दिस्वा पटिबध्दचित्ता हुत्वा सचे तं लभामि, जीवीस्सामि; नो चे मरिस्सामीति सयने अधोमुखी निपज्जि।

अथस्सा पिता तं पवत्तिं सुत्वा एकधीतुताय बलवसिनेहो सहस्सलञ्ञं दत्वा उपायेनेव चोरं विस्सज्जापेत्वा गन्धोदकेन न्हापेत्वा सब्बाभरण पटिमण्डितं कारेत्वा पासादं पेसेसि। भद्दापि परिपुण्णमनोरथा अतिरेकालङ्करिन अलङ्करित्वा तं परिचरति। सत्तुको कतिपाहं वीतिनामेत्वा तस्सा आभरणेसु उप्पन्नलोभो भद्दे, अहं नगरगुत्तिकेन गहितमत्तोव चोरपपाते अधिवत्थाय

देवताय ''सचाहं जीवितं लभामि, तुय्हं बलिकम्मं उपसंहरिस्सामी'' ति पत्थनं आयाचिं, तस्मा बलिकम्मं सज्जापेहीति।

सा ''तस्स मनं पुरेस्सामी'' ति बलिकम्मं सज्जापेत्वा सब्बाभरणविभुसिता सामिकेन सध्दिं एकं यानं अभिरूय्ह ''देवताय बलिकम्मं करिस्सामी'' ति चोरपपातं अभिरूहितुं आरध्दा।

सत्तुको चिन्तेसि–''सब्बेसु अभिरूहन्तेसु इमिस्सा आभरणं गहेतुं न सक्का'' ति परिवारजनं तत्थेव ठपेत्वा तमेव बलिभाजनं गाहापेत्वा पब्बतं अभिरूहन्तो तायसद्धिं पियकथं न कथेसि। सा इङ्गितेनेव तस्साधिप्पायं अञ्ञासि। सत्तुको, ''भद्दे, तव उत्तरसाटकं ओमुञ्चित्वा कायारूळ्हपसाधनं भण्डिकं करोहि'' ति। सा, ''सामि, मय्हं को अपराधो ''ति''? किं नु मं बाले, बलि कम्मत्थं आगतो'ति सञ्ञं करोसि? बलिकम्मापदेसेन पन तव आभरणं गहेतुं आगतो'ति। ''कस्स पन, अय्य, पसाधनं, कस्स अह'' न्ति ? ''नाहं एतं विभागं जानामी'' ति।

'होतु, अय्य, एकं पन मे अधिप्पायं पुरेहि, अलङ्कतनियामेन च आलिङ्गितुं देही'ति। सो ''साधु'' ति सम्पटिच्छि। सा तेन सम्पटिच्छितभावं ञत्वा पुरतो आलिङ्गित्वा पच्छतो आलिङ्गन्ती विय पब्बतपपाते पातेसि। सो पतित्वा चुण्णविचुण्णं अहोसि। ताय कतं अच्छरियं दिस्वा पब्बते अधिवत्था देवता कोसल्लं विभावेन्ती इमा गाथा अभासि–

''न हि सब्बेसु ठानेसु, पुरिसो होति पण्डितो।<br>
इत्थीपि पण्डिता होति, तत्थ तत्थ विचक्खणा।।<br>
न हि सब्बेसु ठानेसु, पुरिसो होति पण्डितो।<br>
इत्थीपि पण्डिता होति, लहुं अत्थविचिन्तिका'' ति।।

**संदर्भ – थेरीगाथा अट्ठकथा – पञ्चकनिपातो –**
**(भद्दाकुण्डलकेसाथेरी – आवश्यक फेरफार करून)**

**शब्दार्थ / सद्दत्थ**

वड्ढमाना – वाढण्यायोग्य.
वयप्पत्ता – विवाहयोग्य / वयप्राप्त.
राजाणाय – राजाज्ञेने.
पटिबध्दचित्ता – आसक्त, मोहित.
बलवसिनेहो – अतिशय स्नेह.
सहस्सलञ्जं – हजारोची लाच.
गन्धोदकेन – सुगंधीत पाण्याने.
अतिरेकालङ्कारेन – खुप जास्त अलंकाराने.
वीतिनामेत्वा – वेळ घालवून, उशीर करून.
नगरगुत्तिकेन – नगराध्यक्ष, नगराधिपति.
बलिकम्मं – बळी देणे, आहुति.
चारेपपातं – कडेलोट.
आरध्दा – आरंभ केला.
ओमुञ्चित्वा – वस्त्र फेडणे, सोडून टाकणे.
कायारूळ्हपसाधनं – शरीराची सजावट.
आभरणं – अलंकार.
पसाधनं – सजावट.
आलिङ्गिन्ती – आलींगन.
विभावेन्ती – बुध्दिवन्त.
विचक्खणा – दृष्टीक्षेप करणे.
अत्थविचिन्तिका – अर्थबोध घेणे.

## स्वाध्याय

**१) प्रश्नांची उत्तरे लिहा :**

अ) भद्दा चोराच्या प्रेमात कशी पडली ?

ब) भद्दाच्या हुशारीचे वर्णन करा ?

**२) प्रश्नांची उत्तरे पालि भाषेत लिहा :**

अ) चोरस्स नाम किं अत्थि ?

ब) सत्तुको लोभो किदिसा होति ?

**३) सन्धि विग्रह करा :**

इत्थिपि, गन्धोदकेन, गहितमत्तोव

# ७  कलहो हि विनासमुलो 

(प्रस्तूत पाठ खुद्दकनिकायतील जातक या ग्रंथातून घेतलेला आहे. संघटनेत सामर्थ्य व विजय अंतर्भुत असतो. संघठितांचा पराभव किंवा विनाश अशक्य असतो परंतु संघटन नसेल, परस्परात कलहभावना असेल तर विनाश अटळ समजला पाहिजे. हा विचार प्रस्तूत कथेतून व्यक्त केलेला आहे.)

अतीते वाराणसियं ब्रह्मदत्ते रज्जं कारेन्ते बोधिसत्तो वट्टकयोनियं निब्बतित्वा अनेक वट्टकसहस्स परिवारो अरञ्ञे वसति। तदा एको वट्टकलुद्दको तेसं वसनट्ठानं गन्त्वा वट्टकवस्सिकं कत्वा तेसं सन्निपतितभावं ञत्वा, तेसं उपरि जालं खिपित्वा, परियन्तेसु महन्तो सब्बे एकतो कत्वा पच्छि पूरेत्वा, घरं गन्त्वा, ते विकिणित्वा, तेन मूलेन जीविकं कप्पेति।

अथेक दिवसं बोधिसत्तो ते वट्टके आह – ''अयं साकुणिको अम्हाकं ञातके विनासं पापेति, अहं एकं उपायं जानामि, येनेस अम्हे गण्हितुं न सिक्खिस्सति। इतोदानि पट्ठाय एतेन तुम्हाकं उपरिजाले खित्तमत्ते एकेको एकेकस्मि जालक्खिके सीसं ठपेत्वा, जालं उक्खिपित्वा, इच्छितट्ठानं हरित्वा एकस्मिं कण्टगुम्बे पक्खिपथ। एवं सन्ते हेट्ठा तेन तेन ठानेन पलायिस्सामा''ति। ते सब्बे ''साधु''ति पटिसुणिंसु ।

दुतियदिवसे उपरिजाले खित्ते ते बोधिसत्तेन वुत्तनयेन जालं उक्खिपित्वा, एकस्मिं कण्टगुम्बे खिपित्वा, सयं हेट्ठाभागेन ततो ततो पलायिंसु। साकुणिकस्स गुम्बतो जालं मोचेन्तस्सेव विकालो जातो, सो तुच्छहथो'व अगमासि। पुनदिवसतो पट्ठय'पि ते वट्टका तथेव करोन्ति। सो'पि याव सुरियत्थङ्गमना जालमेव मोचेन्तो किञ्चि अलभित्वा तुच्छहत्थो गेहं गच्छति।

अथस्स भरिया कुज्झित्वा ''त्वं दिवसे दिवसे तुच्छहत्थो आगच्छसि, अञ्ञपि ते बहि पोसितब्बट्ठानं अत्थि मञ्ञेति आह। साकुणिको – ''भद्दे! मम अञ्ञं पोसितबट्ठानं नत्थि, अपि च खो पन ते वट्टका समग्गा हुत्वा चरन्ति, मया खित्तमत्ते जालं आदाय कण्टकगुम्बे खिपित्वा गच्छन्ति। न खो पन ते सब्बकालमेव सम्मोदमाना विहरिस्सन्ति। त्वं मा चिन्तयि, यदा ते विवादमाप–निस्सन्ति तदा ते सब्बेव आदाय तव मुखं हासयमानो आगच्छिस्सामी'' ति वत्वा भरियाय इमं गाथमाह –

सम्मोदमाना गच्छन्ति, जालमादाय पक्खिणो।

यदा ते विवदिस्सन्ति, ते एहिन्ति मे वसति।।

तत्थ यदा ते विवदिस्सन्ती ति यस्मिं काले ते वट्टका नाना लध्दिका नानागाह। हुत्वा विवदिस्सन्ति कलहं करिस्सन्ती'ति अत्थो। तदा एहिं ति मे वसे ति तस्मिं काले सब्बेपि ते मम वसं आगच्छिस्सन्ति। अथाहं ते गहेत्वा, तव मुखं हासेन्तो आगच्छिस्सामी'ति भरियं समस्सासेसि।

कतिपाहस्सेव पन अच्चयेन एको वट्टको गोचरभूमिं, ओतरन्तो असल्लक्खेत्वा, अञ्ञस्स सीसं अक्कमि, इतरो को मं सीसे अक्कमी''ति कुज्झि। अहं असल्लक्खेत्वा अक्कमि, मा कुज्झी'ति वुत्तेपि कुज्झि येव। ते पुनप्पुनं कथेन्ता, त्वमेव मञ्ञे जालं उक्खिपसी' ति अञ्ञमञ्ञं विवादं करिंसु तेसु विवादन्तेसु बोधिसत्तो चिन्तेसि, – ''विवादके सोत्थिभावो नाम नत्थि, इदानेव ते जालं न उक्खिपिस्सन्ति, ततो महन्तं विनासं पापुणिस्सन्ति, साकुणिको ओकासं लभिस्सति, मया इमस्मिं ठाने न सक्का वसितुंति''। सो अत्तनो परिसं आदाय अञ्ञत्थ गतो।

साकुणिको पि खो कतिपाहच्चयेन आगन्त्वा वत्तवस्सितं वसित्वा, तेसं सन्निपतितानं उपरी जालं खिपि। अथेको वट्टको – ''तुय्हं किर जालं उक्खिपन्तस्सेव मत्थके लोमानि पतितानि इदानि उक्खिपाति'' आह। अपरो ''तुय्हं किर जालं उक्खिपन्तस्सेव द्विसु पक्खेसु पत्तानि पतितानि, इदानि उक्खिपाति'' आह। इति तेसं त्वं उक्खिपं त्वं उक्खिपाति वदन्तानेव साकुणिको जालं उक्खिपित्वा, सब्बेव ते एकतो कत्वा पच्छि पूरेत्वा भरियं हासयमानो गेहं अगमासि।

**(सम्मोदमान जातक)**

---

**शब्दार्थ / सद्दत्थ**

**वट्टकयोनि** – लावा पक्ष्याची जात.

**निब्बत्तति (क्रि.)** – उत्पन्न होणे,जन्मणे.

**अनेक वट्टक सहस्स परिवारो** – हजारो लावा पक्ष्यांचा समूह.

**वट्टक लुद्दक** – लावे पकडणारा.

**वसनट्ठानं (नपु.)** – राहण्याची जागा – ठिकाण.

**सन्निपतित (कृ.)** – एकत्र येवून, गोळा होवून.

**विकिणित्वा (पू.क्रि.)** – विकून.

**साकुणिक** – पक्षी पकडणारा.

**कण्टकगुम्बं** – काटेरी झूडुप.

**वुत्तनयेनेव (वृत्त+नयेन+एव)** – सांगितलेल्या प्रकारानेच.

**मोचेत्वा (पू. क्रि.)** – मोकळे करून, मुक्त करून, सुटका करून.

**उक्खिपित्वा (पू.क्रि.)** – वर उचलून.

**मत्थक (पू.)** – मस्तक, शिर, डोके.

## स्वाध्याय

**प्रश्न १ खालील प्रश्नांची उत्तरे लिहा.**

१. बोधिसत्वाने आपल्या बांधवांना शिकाऱ्याच्या तावडीत न सापडण्याचा कोणता उपाय सांगितला ?

२. असंघटितपणाचा दुष्परिणाम थोडक्यात स्पष्ट करा.

**प्रश्न २ संधी विग्रह करा –**

१. सोपि.

२. जालमेव.

३. उक्खिपाति.

**प्रश्न ३ खालील क्रियापदांची रूपे ओळखा –**

१. करिस्सन्ति.

२. जानामि.

३. लभिस्सन्ति.

४. गच्छन्ति.

❑❑❑

# ८ उच्छङ्गजातकवण्णना

कोशल राष्ट्रात राहणाऱ्या तीन लोकांना राजाचे शिपाई पकडून बंदिस्त करतात. तेव्हा एक स्त्री राजवाड्यासमोर म्हणते की, ''मला आच्छादन द्या'' अशी याचना करते. तेव्हा तिला राजाने आच्छादन देण्यास सांगितले. परंतु तीने ते नाकारून 'मला स्वामीरूपी आच्छादन द्या' असे म्हटले. राजाने तिला विचारले की, पकडलेल्या लोकांत तुझा पती, भाऊ व पुत्र यापैकी तू कोणाची इच्छा करतेस असे विचारले, तेव्हा ती म्हणाली की, महाराज मला भाऊ द्या. राजाने कारण विचारले तेव्हा तिने पती, मुलगा मिळणे सुलभ आहे, परंतु आईवडिल मृत पावल्यामुळे भाऊ मिळणे कठिण आहे म्हणून मला भाऊ द्या. राजाने तिच्या बुद्धिचातुर्यावर संतुष्ट होऊन त्या तिघांनाही बंदीतून सोडून दिले.

---

एकस्मिं हि समये कोसलरट्ठे तयो जना अञ्ञतरस्मिं अटविमुखे कसन्ति। तस्मिं समये अन्तो अटवियं चोरा मनुस्से विलुम्पित्वा पलायिंसु । ते च चोरे परियेसित्वा अपस्सन्ता तं ट्ठानं आगन्त्वा, ''तुम्हे अटवियं विलुम्पित्वा, इदानि कस्सका विय होथाति, ''ते चोरा इमे'' ति बन्धिता, अनेत्वा, कोसलरञ्ञो अदंसु। अथेका इत्थी आगन्त्वा, ''अच्छादनं मे देथ, अच्छादनं मे देथा'' ति परिदेवन्ती पुनप्पनं राजनिवेसनं परियाति। राजा तस्सा सद्दं सुत्वा, ''गच्छथ, देहि इमिस्सा अच्छादनं'' ति। मनुस्सा साटकं गहेत्वा अदंसु। सा तं दिस्वा, ''नाहं एतं अवच्छादनं याचामी'', सामिकच्छादनं याचामी''ति आह। मनुस्सा गन्त्वा रञ्ञो आरोचयिंसु ''न किरेसा इदं अच्छादनं कथेति, सामिकच्छादनं कथेती''ति। अथ नं राजा पक्कोसापेत्वा, त्वं किर सामिकच्छादनं याचसी'ति पुच्छि। आम देव, इत्थिया हि सामिको अच्छादनं नाम, सामिकेहि असति सहस्समूलकं पि साटकं निवत्था इत्थी नग्गा येव नाम। इमस्स पनत्थस्स साधनत्थं–

''नग्गा नदी अनुदका, नग्गं रट्ठं अराजकं।

इत्थी पि विधवा नग्गा, यस्सा पि दस भातरो''ति ।।

इदं सुत्तं आहरितब्बं ।

राजा तस्सा पसन्नो, ''इमे ते तयो जना के होन्ती'ति पुच्छि। एको मे देव सामिको, एको भाता, एको पुत्तो ति। राजा ''अहं ते तुट्ठी, इमेसु तीसु एकं देमि, कतरं इच्छसी?'ति पुच्छि। सा आह, ''अहं देव जीवमाना एकं सामिकं लभिस्सामी, पुत्तं पि लभिस्सामि, येव, माता पितुनं मे मतत्ता भाता व दुल्लभो, भातरं मे देहि देवा'' ति। राजा तुस्सित्वा, तयो पि विस्सज्जेसि। एवं तं एकिकं निस्साय ते तयो जना दुक्खतो मुत्ता। तं कारणं भिक्खुसंघे पाकटं जातं। अथेक दिवसं भिक्खू धम्मसभाय सन्निपतिता, ''आवुसो एकं इत्थिं निस्साय तयो जना दुक्खतो मुत्ता''ति तस्सा गुणकथाय निसीदिसुं। सत्था आगत्वा, काय नुत्थ भिक्खवे एतरहि कथाय सन्निसिन्ना'' ति पुच्छित्वा, ''इमाय नामा'' ति वुत्ते, ''न भिक्खवे, एसा इत्थी इदानेव ते तयो जने दुक्खा मोचेति पुब्बे पि मोचेसि येवा'' ति तत्वा अतितं आहरि।

अतीते वाराणसियं ब्रम्हदत्ते रज्जं कारेन्ते तयो जना अटविमुखे कसन्ती ति सब्बं पुरिमसदिसमेव। तदा पन रञ्ञा, ''तीसु जनेसु कं इच्छसी?'' ति वुत्ते सा आह – '' तयो पि दातुं न सक्कोथ देवा? ''ति। आम, न सक्कोमी ति। सचे तयो दातुं न सक्कोथ भातरं मे देथा'' ति । पुत्तं वा सामिकं वा गण्ह, किं ते भातरा ति च वुत्ता, ''एते नाम देव सुलभा, माता पन दुल्लभो ति वत्वा इमं गाथमाह –

''उच्छङ्गे देव मे पुत्तो, पथे धावन्तिया पति।

तं च देसं न पस्सामि, यसो सोदरिय मानयेती'' ति

राजा, ''सच्चं एसा वदती'' ति तट्ठचित्तो तयो पि जने बन्धनागारतो आनेत्वा अदासि। सा तयो पि ते गहेत्वा गता।

**जातकअट्ठकथा – पठमो भागो**
**नवनालन्दा महाविहार – गन्थमाला**

---

## शब्दार्थ / सद्दत्थ

अटवि (स्त्री) – अरण्य, जंगल.
अञ्ञतरस्मिंह्न(पु.) – अन्यतर, दुसऱ्या.
कसन्ति (स्त्री.) – शेती करतात.
विलुम्पित्वा (कृ) – चोरून, लुटुन.
पलायिंसु (क्रि.) – पळून जातात.
परियेसित्वा (स्त्री.) – शोधून.
अपस्सन्ता (क्रि.) – न पाहता.
ट्ठानं – ठिकाण.
आगम्म (पु.) – येणे.
इमे (सर्वनाम) – ह्या.
अदसुं (क्रि.) – दिलेत.
देथा (क्रि.) – द्यावेत.
परिदेवन्ती (क्रि.) – रडणे, ओरडणे, आक्रोश करणे.
परियाति (क्रि.) – चोहीकडे फिरणे.
सद्दं (पु.) – शब्द, आवाज.
इमिस्सा – ह्या.
साटकं (नपु.) – भिक्खूचे वस्त्र.
याचामि (नपु.)– मी याचना करतो.
आरोचयिंसु (स्त्री.) – घोषणा केली जाणे.
किरेसा (अव्य.) – वास्तविक.

## अभ्यास

### सन्धि विग्रह –

अथेक दिवसं – अथ + एकदिवसं.
इत्थीपि – इत्थी + अपि.
बन्धनगारतो – बन्धन + आगरतो.
गाथमाह – गाथं + आह.

### रूपे ओळखा –

पलायिंसु, विलुम्पित्वा, गच्छथ, याचामि, लुभिस्सामि, दातुं.

### जोड्या लावा –

| ‘अ’ गट | ‘ब’ गट |
|---|---|
| १. चोरा मनुस्से | १. मे देथां’ति परिदेवन्ती |
| २. अच्छादनं | २. न सक्कोथ |
| ३. सचे तयो दातुं | ३. विलुम्पित्वा पलायिंसु |
| ४. भिक्खू धम्मसभाय | ४. निसीदिंसु |
| | ५. सन्निपतिता |

**प्रश्न :** राजसेवकांनी कोणाला व का पकडले ?

**प्रश्न :** स्त्रीने राजाला काय मागितले ?

**प्रश्न :** राजाने स्त्रीच्या कोणत्या बोलण्यावर संतुष्ट होऊन चोरांची सुटका केली ? ते पाठाच्या आधारे लिहा.

❑❑❑

# ९

# चीन देसिय पवासि – युवानच्वांग

(प्राचीन भारतामध्ये बौद्ध धम्माचा प्रचार व प्रसार भारताच्या पूर्वेकडील व उत्तरेकडील अनेक देशामध्ये अर्थातच संपूर्ण मध्य आशियामध्ये झालेला होता. त्याचा परिणाम असा झाला की चीन सारख्या देशामधून अनेक भिक्खू बौद्ध धम्माच्या अध्ययनाकरिता भारतामध्ये आलेत. त्यात तीन चीनी प्रवासी फार प्रसिद्ध आहेत. यात युवानच्वांग हे एक अतिशय महत्वाचे प्रवासी आहेत. त्यांनी नालंदा विद्यापीठामध्ये सुद्धा बौध्द धम्माचे अध्ययन केले होते. त्याचप्रमाणे त्यांनी भारतामधील व सीलोन मधील अनेक बौद्ध विहारांना सुद्धा भेटी दिलेल्या होत्या. यांचे प्रवास वर्णन प्राचीन भारतातील इतिहासाच्या दृष्टीने अतिशय महत्वाचे आहे.)

अतीते किर भारतस्स विञ्ञावन्ता पञ्ञावन्ता सब्बत्थ विस्सुता। तेन विविधेही देसेहि जना ञाणं लद्धं, सिप्पं च विज्जं च सिक्खितुं एत्थ आगता। चीन रट्ठतो पि बहवो जना भारतं आगता। तेसु एको 'युआनच्वांग' नामको। यदा जम्बुदीपे राजा हस्सवड्ढनो रज्जं कारेति। तदा कतिपयानि वस्सानि भारते वसित्वा सो चीनदेसं पटिनिवतो। हिमवतो उत्तरेन चीनदेसो वत्तेति। ततो भारतं आगन्तु यो अध्दा सो अतिविय कठिनो भयपरिपुण्णो च तस्मिं अध्दानि, उच्चा पब्बता'भयङ्करा गुहायो, विसाल नदिया, घोरानि अरञ्ञानि च होन्ति।

वालमिगेहि जीवितं रक्खितब्बं होति। यो तेन अध्दता गन्तुं इच्छति तेन अड्ढुनो मरू-पब्बत-गहन-निमित्ता विसेसा अधिलक्खितब्बा होन्ति। यो कोचिनं अध्दानं जानानि ते मग्गु देसकं कत्वा तेन सद्धिं येव गन्तब्बं होति। एवं ञाणं अधिगन्तु जीवितम्पि अनपेक्खो हुत्वा युआनच्वांग पण्डितो जम्बुदीपं आगतो। आगन्त्वा बुद्धधम्मस्स उपासको हुत्वा, जम्बुदीपे यत्थ तथ्य चरित्वा, बहवो गन्था तेन पठिता, लोकचरिया दिट्ठा; बुद्धधम्मस्स अज्झयनं कतं। चीनदेसं पटिनिवत्तकाले तेन अत्तना सद्धिं बहवो गन्था नीता। अत्तनो चारिकाय वण्णनं कत्वा एकं पोत्थकं पि तेन लिखितं। यं यं तेन एत्थ दिट्ठं, सुतं, अनुभूतं च तं तत्थ वण्णितं। अत्तनो रट्ठ परिनिवत्तित्वा तेन अनेकेसं सुगत गन्थानं चीनस्स भासाय परिवत्तनं कतं।

'भारते पाचीनकाले बहवो राजमग्गा होन्ति। तेहि अध्दानेही तक्कसिला, वेसाली, राजगहं, पाटलिपुत्तं, सावत्थी, उज्जेनी, वाराणसी, पतिट्ठानं ति विस्सुतानी नगरानि अञ्ञमञ्ञं सम्बन्धानि। तेसु अध्दानेसु दानरता राजानो विहारे, आरामे, पोक्खरनियो, भोजनसालायो पथिगेहानिच निम्मित्तित्वा, पजानं, कल्याणं करोन्ती'ति युवानच्वांग पण्डितो लिखति।'

**(प्रवासवर्णन – युवानच्वाङ्ग)**

**शब्दार्थ / सद्दत्थ**

**विञ्ञावन्त (पु.)** – विद्वान.

**सिप्प (नपु.)** – शिल्प, कला.

**ञाण लद्धं (अ)** – ज्ञान मिळविण्यासाठी.

**नामकं (वि.)** – नावाचा.

**हस्सवड्ढन (पु)** – सम्राट हर्षवर्धन.

**कतिपय (वि.)** – काही.

**वस्सित्वा (अ)** – राहून.

**उत्तरेन (अ.)** – उत्तरेला.

**अध्दं (पुं.)** – मार्ग.

**घोरं (वि.)** – भयंकर.

**सब्बत्थ(अ)** – सर्व ठिकाणी, सर्वत्र.

**चीनरट्ठ (नपु.)** – चीनराष्ट्र.

**युवानच्वाङ्ग** – इ.स.च्या ७ व्या शतकात भारतात आलेला चिनी प्रवासी व बौध्द धम्माचा अनुयायी-भिक्खू.

**वस्स (नपु.)** – वर्ष.

**हिमवतं (पु.)** – हिमाचल पर्वत.

**भयं (नपु.)** – संकट.

**विसाल (वि.)** – विशाल, विस्तीर्ण.

**वालमिगे (पु.)** – हिंस्त्र पशु.

**अधिलिक्खितब्बं (वि.)** – लक्षात घेण्यायोग्य.
**अधिगन्तुं (अ.)** – मिळविण्यासाठी.
**चरित्वा (अ.)** – हिंडून, विचरण करून.
**लोकचरिया (स्त्री.)** – लोकांचे आचार, जीवनपद्धती.
**पटिनिवत्तन (नपुं.)** – परत जाणे.
**चारिका (स्त्री.)** – प्रवास, भ्रमन्ती.
**लिखितं (वि.)** – लिहिलेला.
**वण्णितं (वि.)** – वर्णिलेला.
**सुगत गन्थ (पु.)** – बुद्धाविषयी ग्रंथ.
**परिवत्तन (नपुं.)** – परिवर्तन, भाषांतर.
**पथिकगेह (नपुं.)** – धर्मशाळा, विश्रामगृह.
**पतिट्ठान (नपुं.)** – हल्लीचे पैठण (महाराष्ट्र).
**मग्गुद्देसक (पु.)** – मार्गदर्शक.
**अनपेक्ख (वि.)** – निरपेक्ष, निरिच्छ.
**पठित (वि.)** – वाचलेला, अभ्यासिलेला.
**अज्झयन (नपुं.)** – अध्ययन, अभ्यास.
**गन्थ (पु.)** – ग्रंथ.
**वण्णन (नपुं.)** – वर्णन.
**अनुभूत (वि.)** – अनुभवलेला.
**पटिनिवत्तित्वा (पूर्व. कि.)** – परत जाऊन.
**चीनभासा (स्त्री.)** – चीनीभाषा.
**भोजनसाला (स्त्री.)** – भोजनशाळा.
**दानरत (वि.)** – दानात आनंद मानणारा.
**निम्मिनित्वा (अ.)** – निमार्ण करून.

## स्वाध्याय

### खालील प्रश्नांची उत्तरे लिहा –

१. युवानच्वांग ची मातृभूमी कोणती?
२. भारतात तो केव्हा व कशाकरीता आला होता?
३. युवानच्वांग भारतातून काय घेवून गेला?
४. त्याने काय लिहुन ठेवले आहे?

### रूपे ओळखा –

सिक्खितुं, वसित्वा, जानाति, वाराणसी, हुत्वा.

### योग्य पर्याय देऊन वाक्य पूर्ण करा.

१. हिमवतो उत्तरेन चीनदेसो ............ । (पत्तति / पत्तेन)
२. एक पोत्थकं पि तेन ............. । (लिखितेन / लिखितं)
३. सुगतं गन्थानं चीन भासाय ........... कतं । (परिवत्तनं / परिवत्तेन)
४. बुद्धधम्मस्स ................. कतं । (अज्झयनं / अज्झयनेन)

### खालील दिलेली वाक्य पाठातील घटना क्रमानुसार पुन्हा लिहा.

१. अत्तनो चारिकाय वण्णन कत्वा एकं पोत्थकं पि तेन लिखितं ।
२. तेसुं एको ‘युआनच्वाङ्ग’ नामको ।
३. वालमिगेहि जीवितं रक्खितब्बं होति ।
४. अत्तनो रट्ठं पटिनिवतित्वा तेन अनेकेस सुगतस्स गन्थानं चीन भासाय परिवत्तनं कतं ।
५. चीन रट्ठतो'पि बहवो जना भारतं आगता ।

❑❑❑

# १०  ततिय संगीति कथासंक्खेपो 

(पालि साहित्यामध्ये तीसऱ्या संगितीला फार महत्त्व आहे. कारण या तीसऱ्या संगितीमध्ये पालि तिपिटकाचे अंतीम स्वरूप निश्चित करण्यात आलेले होते. ही तीसरी संगिती पाटलीपुत्त (पटणा, बिहार) येथे महान सम्राट अशोकाच्या काळामध्ये आयोजित करण्यात आलेली होती. अशोक गुरू व महान आचार्य भदंतमोग्गल्लिपुत्ततिस्स हे या संगितीचे अध्यक्ष होते. या संगितीला सम्राट अशोकाचे संपूर्ण राजकीय संरक्षण प्राप्त झालेले होते. ही संगिती इसवीसन पूर्व तीसऱ्या शतकामध्ये आयोजित करण्यात आलेली होती. या संगितीच्या आयोजनाच्या वेळी बौद्ध धम्मामध्ये वेगवेगळे विचार प्रवाह निर्माण झालेले होते. त्यांना नियंत्रित करण्यासाठी या संगितीच्या आयोजनाच्या वेळी केल्या गेलेले प्रयत्न फार महत्त्वाचे आहेत. ही संगिती ऐतिहासिक आहे. त्याच प्रमाणे पालि साहित्याच्या दृष्टीनेही महत्त्वाची आहे.)

ततो परं अट्ठतिंसाधिकानि द्वेवस्ससतानि सम्मासम्बुद्धस्स भगवतो सासनं निराकुलं अहोसि निरब्बुंदा अट्ठतिंसाधिके पन द्विवस्ससते सम्पत्ते पाटलिपुत्तनगरे सिरिधम्मासोकस्स रञ्ञो नाम काले निग्गोधसामणेरं पटिच्च बुद्धसासने पसीदित्वा भिक्खूसंघस्स लाभसक्कारं बाहुल्लं अहोसि । तदा सट्ठिसहस्समत्ता तित्थिया लाभ सक्कारं अपेक्खित्वा अपब्बजिता पि पब्बज्जिता विय हुत्वा उपोसथ पवारणादिकम्मेसु पविस्सन्ति – सेय्यथा पि नाम हंसानं मज्झे वका, यथा च गुन्नं मज्झे गवजा, यथा च सिन्धवानं मज्झे गद्दभा ति।

